आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१५/प्र.क्र.१०२/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-३ जुलै, २०१५.

वाचा :-

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.

प्रस्तावना :-

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यास शासन निर्णय क्रमांक- माविम-२००२/ प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५ फेब्रुवारी, २००७ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदरचा कार्यक्रम राबविण्याबाबत केंद्र शासन, महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी यांच्यामध्ये दिनांक १२.१०.२००६ रोजी करार झाला आहे. सदर कार्यक्रम सन २००६-०७ ते २०१४-१५ या आठ वर्षाच्या कालावधीत राबविण्याकरीता रु.११५.४५ कोटी इतका निधी आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी या आंतरराष्ट्रीय संस्थेकडून कर्जनिधी मंजूर आहे.

२. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी २२३५- A ४८५ या लेखाशिर्षाखाली आयफॅडचा हिस्सा म्हणून ₹३.३६ कोटी इतका निधी माविमला वितरीत करण्यात आला आहे. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र माविमने शासनास सादर केले आहे. सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी २२३५-A ४८५ या लेखाशिर्षाखाली एकूण ₹८,७७,१०,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी सत्याहत्तर लक्ष दहा हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध असलेली तरतूद माविमला वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळासाठी आयफॅडचा हिस्सा म्हणून सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात ₹८,७७,१०,०००/- इतकी तरतूद मंजूर आहे. वित्त विभागाच्या दि.१७ एप्रिल, २०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये मंजूर तरतूदीच्या ७०% मर्यादेत निधी वितरणास परवानगी आहे. त्यानुसार सदर योजनेच्या मंजूर निधी ₹८,७७,१०,०००/- च्या ७०% मर्यादेत म्हणजे **₹६,१३,९७,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी तेरा लक्ष सत्यान्नव हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करावा.

३. मुक्त करण्यात आलेले अनुदान जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाद्वारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

४. हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित केल्यानंतर केंद्र शासनामार्फत आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी कडून याची प्रतीपूर्ती करुन घेण्यात येईल. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकातील ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या बाबीसाठी निधी वितरणासाठी विहीत केलेल्या अटींची पूर्तता झाली आहे.

५. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (०३) (१०) तेजस्विनी ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास सहायक अनुदान (२२३५ A ४८५) ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०७०३११४००२५०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Divekar

Digitally signed by Manohar Ramchandra Divekar
DN: CN = Manohar Ramchandra Divekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.07.03 17:00:19 +05'30'

**म.रा.दिवेकर**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग.
११. निवड नस्ती, का-१०.